भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेतील “उपअभियंता (यांत्रिकी)” संवर्गातील अधिकाऱ्यांच्या विनंती बदल्या- २०२०

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन आदेश क्रमांकः आपना-०२२०/प्र.क्र.७८/पापु-१५

सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रूग्णालय इमारत संकुल, नवीन मंत्रालय इमारत,
क्रॉफर्ड मार्केटजवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुबई ४०० ००१
तारीख: ११ नोव्हेंबर, २०२०

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या तरतुदीनुसार व सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक एसआरव्ही-२०२०/प्र.क्र.३०/कार्या १२, दिनांक ०७/०७/२०२० व दिनांक २३/०७/२०२० मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेमधील "उपअभियंता (यांत्रिकी)" संवर्गातील अधिकाऱ्यांच्या दिनांक ०१/१०/२०२० रोजीच्या आदेशान्वये विनंती बदलीने पदस्थापना करण्यात आल्या होत्या.

दिनांक ०१/१०/२०२० च्या आदेशातील उपअभियंता (यांत्रिकी) श्री. ए.के. पाटील यांची पदस्थापना देखभाल दुरुस्ती कक्ष, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, सातारा येथे करण्यात आली होती. तथापि, देखभाल दुरुस्ती कक्ष, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, सातारा येथे पद उपलब्ध नसल्याने श्री. पाटील यांच्या पदस्थापनेत बदल करणे आवश्यक आहे. त्यानुसार श्री. ए.के. पाटील, उपअभियंता (यांत्रिकी) यांच्या आदेशात खालीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे.

| अ.क्र. | उपअभियंता (यांत्रिकी) यांचे नाव | सध्याचे कार्यालय | विनंती बदलीनंतरचे कार्यालय (सुधारित) |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. अधिराज के. पाटील | जिल्हा परिषद, वाशीम | यांत्रिकी (उपविभाग), ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, सातारा. **(देखभाल दुरुस्ती कक्ष, ग्रामीण पाणी पुरवठा, जिल्हा परिषद, सातारा येथील पदस्थापना रद्द करून)** |

हे आदेश तात्काळ अंमलात येतील. बदली झालेल्या संबंधित अधिकारी ते बदली झालेल्या कार्यालयात रूजू झाले आहेत किंवा कसे, याची माहिती तात्काळ शासनास सादर करण्याबाबत संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांना सूचित करण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१११११५५५०९१७२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Chetan Balasaheb Nikam

Digitally signed by Chetan Balasaheb Nikam
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply and Sanitation Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=946f8eff01148466e26f8d80863da34d0a26661f5eefb602c359549d8ed4511e, serialNumber=7268de40660971f80951c66d0e657e903b378196f51a978d2a366cf5eb564c0c, cn=Chetan Balasaheb Nikam
Date: 2020.11.11 16:20:39 +05'30'

**(चेतन निकम)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

संबंधित उपअभियंता (यांत्रिकी), भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा.

**प्रत-**

१. मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, भूजल भवन, शिवाजीनगर, पुणे.
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व).
६. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर, अमरावती, औरंगाबाद,नाशिक, पुणे, कोकण.
७. कार्यकारी अभियंता (ग्रामीण पाणी पुरवठा), जिल्हा परिषद (सर्व).
८. जिल्हा वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा (सर्व).
९. जिल्हा कोषागार अधिकारी, संबंधित सर्व जिल्हे.
१०.निवडनस्ती कार्यासन, पापु-१५